**निसर्गपूरक व हवामान अनुकूल शेती पध्दती विकसित करण्यासाठी वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थे समवेत केलेल्या कराराच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : नादेकृ ४६२३/प्र.क्र.८९/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक - १२ मार्च, २०२४.

**संदर्भ** - दिनांक १४ डिसेंबर, २०२३ रोजी वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थे समवेत झालेला सामंजस्य करार.

**प्रस्तावना -**

शेती व शेतकऱ्यांच्या विकासासाठी राज्याच्या कृषि विभागाकडून अनेक कार्यक्रम, योजना, प्रकल्प राबविले जातात. तथापि, बदलत्या हवामानामुळे ऋतुचक्रावर परिणाम होऊन त्याचा सर्वाधिक प्रभाव शेतीवर होत असल्याचे दिसून येत आहे. जमिनीचे अवनतीकरण, घटत जाणारे सेंद्रिय कर्ब, इत्यादीमुळे पीक उत्पादकतेवर एकत्रित परिणाम दिसून येत आहे. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प व डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती अभियानाद्वारे हवामान अनुकूल शेती पध्दती, तसेच नैसर्गिक शेतीचे प्रयोग निवडक क्षेत्रात करण्यात येत आहेत. हवामान बदलाचा परिणाम राज्याच्या कृषि क्षेत्रावर व तेथील पिकपद्धतीवर वेगवेगळा होत असल्यामुळे त्याचा अभ्यास होणे गरजेचे आहे.

वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) ही संस्था मागील तीन दशकांपासून ग्रामीण विकास क्षेत्रात कार्यरत आहे नाबार्ड बैंक, कृषी विभाग, मृद-जलसंधारण विभाग यांच्या समन्वयाने या संस्थेने पाणलोट क्षेत्र विकास, जल व्यवस्थापन, वातावरण अनुकूल शेती, पर्यावरणपूरक उपक्रम असे प्रकल्प राबविले आहेत. तसेच, संस्थेने विविध विषयांवर संशोधनात्मक कार्य केले आहे. जल व्यवस्थापनाच्या विविध पैलूंच्या आधारे गावांचे मूल्यांकन करण्यासाठी Water Governance Standard नावाचे एक संरचना (Framework) तयार करून ते प्रसिद्ध केले आहे. तसेच, हवामान विभाग आणि राष्ट्रीय कृषी संशोधन परिषद यांच्या सहकार्याने शेतकऱ्यांसाठी हवामान आधारित सल्ला तसेच विविध माहिती देणारे फार्मप्रिसाईज नावाचे एक मोवाईल ॲप या संस्थेने तयार केले आहे. निसर्गपूरक व हवामान अनुकूल शेती पद्धतीचे मूल्यांकन, शेतकऱ्यांसाठी हवामान आधारित सल्ला तसेच विविध विषयांची माहिती आणि सहभागी जल व्यवस्थापन प्रत्येक गावापर्यंत पोहोचविण्यासाठी राज्य शासनाच्या संयुक्त विद्यमाने निवडक जिल्ह्यात पथदर्शी प्रकल्प हाती घेण्यासाठी वॉटर संस्थेने शासनाकडे प्रस्ताव सादर केला होता.

केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण विभागाद्वारे हवामान अनुकुल शेतीचा अनुषंगाने गावस्तरावर आराखडे तयार करण्याकरिता संरचना (Framework) तयार करण्यासाठी राष्ट्रीय समिती गठीत करण्यात आली असून वॉटर संस्थेचे प्रतिनिधी सदर समितीचे सदस्य आहेत. राष्ट्रीय शाश्वत शेती मिशन अंतर्गत हे आराखडे तयार करण्याचे केंद्र शासनाचे नियोजन आहे. तसेच निसर्गपूरक व हवामान अनुकूल शेतीला चालना देण्यासाठी डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती अभियान राज्यात राबविण्यात येत आहे.

उपरोक्त परिस्थिती विचारात घेता, राज्यातील निवडक जिल्ह्यांमध्ये निसर्गपूरक व हवामान अनुकूल शेती पद्धती विकसित करण्यासाठी वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थे समवेत शासनाने दिनांक १४ डिसेंबर, २०२३ रोजी सामंजस्य करार केलेला आहे. या अनुषंगाने दिनांक १७ जानेवारी, २०२४ रोजी अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या दालनामध्ये बैठकीमध्ये या सामंजस्य कराराच्या अनुषंगाने संबंधित क्षेत्रीय कार्यालयांना तपशीलवार सूचना शासन परिपत्रकान्वये देण्याबाबत सूचित करण्यात आले.

**शासन परिपत्रक :**

वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थेसमवेत दिनांक १४ डिसेंबर, २०२३ रोजी झालेल्या सामंजस्य करारानुसार निसर्गपूरक हवामान अनुकूल शेती पद्धतींचे गावपातळीवर मूल्यांकन व उपक्रमांचे प्राधान्य ठरविण्यासाठी पायाभूत सर्वेक्षण संरचना (Framework) तयार करून ते राज्यातील अहमदनगर, जालना व धाराशिव या तीन जिल्ह्यांमध्ये राबविण्यात येईल. निसर्गपूरक शेती पद्धतीचे गावपातळीवर मूल्यांकन करुन ते संबंधित गावात क्रमाक्रमाने राबविण्यासाठी आराखडा (Road map) तयार करण्यात येईल. तसेच वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थेने तयार केलेल्या फार्मप्रिनाईज मोबाईल ॲपची जोडणी सर्व संबंधित शेतकऱ्यांना उपलब्ध करून देण्यात येईल.

२. वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थेच्या मदतीने वातावरणीय बदलाच्या जोखिमा व निसर्गपूरक शेती पद्धतींचे विश्लेषण करून गावाचे पायाभूत मूल्यांकन करण्यासाठी संरचना (Framework) तयार केले जाईल. पथदर्शी जिल्ह्यात निवडक गावांचे पायाभूत मूल्यांकन करण्यासाठी संस्थेचे सक्रीय सहकार्य असेल. या निवडक गावांसह एकूण ५०० गावांचे लक्ष्य पूर्ण करायचे उद्दीष्ट असून यासाठी सदर संस्था तांत्रिक सहाय्य करेल, अभियानाचे मुल्यमापन करताना अभियानातील गावांच्या पायाभूत मूल्यांकनात किती व कसा बदल झाला हे सुद्धा स्पष्ट होईल. अशा प्रकारे या संरचनेचा विश्लेषण, मूल्यांकन, नियोजन व मूल्यमापन अशा सर्वच टप्प्यात उपयोग होईल, याची खातरजमा करण्यात यावी.

३. या अनुषंगाने वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) संस्थेच्या जबाबदाऱ्या पुढीलप्रमाणे असतील.

(१) वातावरणीय बदलाच्या जोखिमा व निसर्गपूरक शेती पद्धतीचे विल्लेषण करून गावांचे पायाभूत मुल्यांकन करण्यासाठी संरचना (Framework) तयार करणे,

(२) कृषी विभागाच्या सहभागाने उपरोक्त जिल्ह्यांतील निवडक गावांमध्ये या संरचना (Framework) ची पथदर्शी अंमलबजावणी करणे.

(३) पथदर्शी अमलबजावणी नंतर उपरोक्त तिन्ही जिल्ह्यातील प्रथमत: डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती अभियानात समाविष्ट सर्व गावांसह एकूण ५०० गावांचे पायाभूत मुल्यांकन करण्यासाठी कृषी विभागास सहाय्य करणे.

(४) निसर्गपूरक शेती पद्धतींचे गावपातळीवर मूल्यांकन राज्यातील सर्वच गावात क्रमाक्रमाने राबविण्यासाठी राज्य कृती आराखडा तयार करण्यासाठी कृषि विभागास सहकार्य करणे.

(५) प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी निसर्गपूरक शेती पद्धतींचा अभ्यासक्रम तयार करून कृषी विभागाने नामनिर्देशित केलेल्या मास्टर ट्रेनरना प्रशिक्षित करणे.

(६) कृषी विभागाच्या सहकार्याने किमान २,५०,००० शेतकऱ्यांना फार्मप्रिसाईज मोबाईल ॲपची जोडणी करून हवामान आधारित पीकनिहाय कृषी सल्ला व पशुधन सल्ला उपलब्ध करून देणे.

७) निसर्गपूरक शेती पद्धतींचे मूल्यांकन करणारे संरचना (Framework), राज्य कृती आराखडा आणि फार्मप्रिमाईज अँप यांची माहिती देऊन अमंलबजावणी, अभिसरण (Convergence) व प्रगतीचे सनियंत्रण करण्यासाठी कृषी विभागाच्या संयुक्त विद्यमाने जिल्हास्तरावर कार्यशाळा आयोजित करणे.

४. आयुक्त, कृषि यांनी या कराराच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी नोडल अधिकाऱ्याची नेमणूक करावी, निसर्गपूरक व हवामान अनुकूल शेती पद्धतीला संपूर्ण राज्यात चालना देण्यासाठी व कृती आराखडा तयार करण्यासाठी सर्व संबंधित अधिकाऱ्यांचा कोअर ग्रुप स्थापन करावा. डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती अभियानातील गावांच्या पायाभूत मूल्यांकनातून अभियानातील उपक्रम योग्य पद्धतीने राबविण्यासाठी संस्थेच्या समन्वयाने गाव कृती आराखडे तयार करण्याच्या अनुषंगाने तसेच सदर करारातील उपक्रम राबविण्यासाठी कृषि आयुक्तालय स्तरावरून क्षेत्रीय कार्यालयांना आवश्यक मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात. तसेच, फार्मप्रिसाईज मोबाईल अॅपच्या आधारे शेतकऱ्यांना त्यांच्या शेती परिस्थितीनुसार हवामान आधारित कृषी सल्ला देण्यासाठी आवश्यक ते सहकार्य संस्थेस करावे. निसर्गपूरक शेती पद्धतींच्या अभ्यासक्रमानुसार प्रशिक्षकांचे प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी कृषी आयुक्तालयातील अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन करावे. या कराराच्या अंमलबजावणीचा / प्रगतीचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

५. या पथदर्शी प्रकल्पासाठी वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थेस आय. सी.सी. द्वारे आर्थिक सहाय्य करण्यात येणार असल्याने कृषि विभागाकडून या संस्थेला कोणताही स्वतंत्र निधी उपलब्ध करून दिला जाणार नाही.

६. वॉटरशेड ऑर्गनायझेशन ट्रस्ट (WOTR) या संस्थेसोबत झालेल्या सामंजस्य कराराचा कालावधी १८ महिन्यांचा असून नियोजित कार्य पूर्ण करण्यासाठी आवश्यकतेनुसार सहा महिन्यापर्यंत मुदत वाढ दिली जाईल.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३१२१४४०३३५९०१ असा आहे. हा शासन परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.03.12 14:50:01 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजिवनी प्रकल्प, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा व अ नुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
११. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१२. वित्त विभाग (कार्यासन व्यय -१/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१३. कार्यासन २-अे कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती.